**उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अखत्यारीत असलेल्या अनुदानित शैक्षणिक संस्था (अकृषि विद्यापीठे, अनुदानित महाविद्यालये, अनुदानित अभिमत व समूह विद्यापीठे व त्यांची घटक महाविद्यालये, अनुदानित तंत्र शिक्षण महाविद्यालये/ संस्था, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशिक्षण विद्यापीठे-लोणेरे, सी.ओ.ई.पी. तंत्रज्ञान विद्यापीठ, अनुदानित कला संस्था, आय.सी.टी. विद्यापीठ, डॉ.होमी भाभा राज्य विद्यापीठ, एल.आय.टी. अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ) व विनाअनुदानित/कायम विनाअनुदानित संस्थांमधील सर्व पदवी, पदविका, पदव्युत्तर पदवी व तत्सम अभ्यासक्रमाच्या संस्थांमध्ये विद्यार्थ्यांना वैद्यकीय सोयीसुविधा पुरविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.न्यायाप्र-२०२४/(प्र.क्र.६६/२४) /तांशि-५**
मंत्रालय विस्तार भवन,मादाम कामा मार्ग ,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई .४०००३२
दिनांक-: १० जुलै.२०२४ ,

**संदर्भ :-** संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/ एनजीपी/ न्या.प्र./आ.सु/२०२४/२९३, दिनांक ०५.०७.२०२४.

**प्रस्तावना -:**

राज्यातील उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अखत्यारीत असलेल्या सर्व शैक्षणिक संस्थांमध्ये पदवी, पदविका, पदव्युत्तर पदवी व तत्सम अभ्यासक्रमाच्या शिक्षणाकरीता विद्यार्थी दररोज किमान सहा ते सात तास उपस्थित असतात. काही विद्यार्थ्यांना या कालावधीत तातडीच्या वैद्यकीय उपचारांची गरज भासू शकते. यावेळी संस्थेने उचित व तातडीने कार्यवाही केल्यास विद्यार्थ्याला तात्काळ वैद्यकीय मदत मिळुन अप्रिय घटना टाळता येवू शकते. विद्यार्थ्यांना तात्काळ वैद्यकीय मदत पुरविण्यासाठी संस्थेतील प्राचार्य, शिक्षक,कर्मचारी व विद्यार्थी सहका-यांनी त्याबाबतीत नेहमी सजग असणे आवश्यक आहे. उपरोक्त बाबींचा विचार करता उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अखत्यारीत असलेल्या सर्व पदवी, पदविका, पदव्युत्तर पदवी व तत्सम अभ्यासक्रमाच्या सर्व संस्थांनी विद्यार्थ्यांना तातडीच्या काळात वैद्यकीय सुविधा देण्याबाबत कार्यवाही करण्याच्या सुचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन परिपत्रक -:**

उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अखत्यारीत असलेल्या अनुदानित शैक्षणिक संस्था (अकृषि विद्यापीठे, अनुदानित महाविद्यालये, अनुदानित अभिमत विद्यापीठे, अनुदानित समूह विद्यापीठे व त्यांची घटक महाविद्यालये, अनुदानित तंत्र शिक्षण महाविद्यालये/ संस्था डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशिक्षण विद्यापीठे-लोणेरे, सी.ओ.ई.पी. तंत्रज्ञान विद्यापीठ, अनुदानित कला संस्था, आय.सी.टी. विद्यापीठ, डॉ.होमी भाभा राज्य विद्यापीठ, एल.आय.टी. अभिनव तंत्रज्ञान विद्यापीठ) व विनाअनुदानित/कायम विनाअनुदानित संस्थांमधील सर्व पदवी, पदविका, पदव्युत्तर पदवी व तत्सम अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना तातडीच्या काळात वैद्यकीय सोयीसुविधा देण्यासाठी संस्थांना खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सुचना देण्यात येत आहेत.

१. संस्थेत शिकत असलेल्या विद्यार्थ्यांचा शासनाच्या योजने अंतर्गत अथवा इतर उपक्रमांतर्गत विमा काढण्यात यावे. या संदर्भात शासनाने उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय दि.२५.०८.२०११ व दि.१६.१०.२०२३ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करावी .

२. संस्थेत संबंधित प्राधिकरणांच्या मानकांनुसार first aid cum sick room (अंदाजे २० चौ.मी.) क्षेत्रफळ आवश्यक आहे. तसेच सदर रुम मध्ये तातडीने प्रथमोपचाराकरीता आजारी विद्यार्थ्यांना तातडीची वैद्यकीय व्यवस्था करण्यासाठी लागणाऱ्या सोयीसुविधा उपलब्ध करण्यात यावी .

३. संस्थेतील सर्व विभागांमध्ये तात्काळ प्रथमोपचारासाठी प्रथमोपचार किट उपलब्ध करण्यात यावे.

४. विद्यार्थी तसेच संस्थेतील कर्मचाऱ्यांकरीता दरवर्षी कमीत कमी एक वैद्यकीय प्रथमोपचार प्रशिक्षण व वैद्यकीय तपासणी शिबीर आयोजित करण्यात यावे.

५. सदर प्रशिक्षणामध्ये कृत्रिम श्वासोश्वास (Artificial Respiration) तसेच इतर तातडीचे प्रथमोपचार देणेबाबत त्यांना प्रशिक्षित करण्यात यावे.

६. संस्थेच्या जवळपास उपलब्ध असलेल्या शासकीय रुग्णालय, शासकीय आरोग्य केंद्र, खाजगी दवाखाने यांचे संपर्क क्रमांक ठळक अक्षरात दर्शनीभागात दर्शविण्यात यावेत व त्यांचेशी समन्वये ठेवण्यात यावा. तसेच शासकीय (१०८) व सार्वजनिक रुग्णवाहिकांचे संपर्क क्रमांक सुध्दा दर्शविण्यात यावेत.

७. आपत्कालीन परिस्थिती उद्भवल्यास सदर परिस्थिती हाताळण्यासाठी संस्थास्तरावर एक ते दोन समन्वयक नेमण्यात यावेत. त्यांना प्रथमोपचाराचे प्रशिक्षण देण्यात यावे.

८. आपत्कालीन परिस्थितीत सदर समन्वयकांने रुग्णास तात्काळ उपचार मिळण्याच्या दृष्टीने रुग्णालयांशी संपर्क साधावा व आजारी विद्यार्थ्यांस रुग्णालयात भरती करण्यास मदत करावी.

९. संस्थेने संस्थेच्या नजीकच्या दवाखान्याशी तसेच जवळपास रहाणाऱ्या/ असणाऱ्या डॉक्टरांची On-call सेवा उपलब्ध करुन देण्याबाबत सामंजस्य करार करावेत व विद्यार्थ्यांना डॉक्टर On-call सुविधा उपलब्ध करुन द्यावी.

१०. आपत्कालीन परिस्थितीकरीता विद्यार्थ्यांना रुग्णालयात नेण्याची गरज भासल्यास संस्थेत वाहनाची उपलब्धतता असावी.

११. विद्यार्थ्यांकरीता संस्थास्तरावर तणावमुक्तीसाठी कार्यशाळा आणि इतर उपक्रमाचे आयोजन करण्यात यावे. विद्यार्थ्यांचे मानसिक आरोग्य चांगले ठेवण्यासाठी समुपदेशक (Counsellor) ची व्यवस्था करण्यात यावी.

वरील सर्व कार्यवाही करुन संस्थाप्रमुख/प्राचार्य यांनी संबंधित सहसंचालक यांच्याकडे एका महिन्यात मुद्देनिहाय पुर्तता अहवाल सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०७१०१२५७४३६१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJAY VITTHAL KHARDE

Digitally signed by AJAY VITTHAL KHARDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=99f2d58601919f488f4e4b4238bd3f1def13cbf3ed7d870c3ce707f566424ec3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C51AE2EF70E8CB85FD2CAD9AA28A46DC972A1A9B3FEB81BAAB9A648B45BE1B24, cn=AJAY VITTHAL KHARDE
Date: 2024.07.10 13:10:05 +05'30'

**(अजय वि. खर्डे)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.

३. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे,
४. कुलगुरु, सर्व अभिमत विद्यापीठे,
५. कुलगुरु, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्र शिक्षण विद्यापीठ-लोणेरे,
६. कुलगुरु, सी.ओ.ई.पी. तंत्रज्ञान विद्यापीठ, पुणे,
७. कुलगुरु, आय.सी.टी. विद्यापीठ,
८. कुलगुरु, डॉ. होबी भाभा राज्य विद्यापीठ, मुंबई.
९. कुलगुरु, एल.आय.टी. अभिनव विद्यापीठ, नागपूर.
१०. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
११. संचालक,उच्च शिक्षण , महाराष्ट्र राज्य,पुणे.
१२. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१३. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई
१४. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,
१५. सर्व विभागीय सहसंचालक, तंत्र शिक्षण,
१६. कुलसचिव, सर्व अकृषि, विद्यापीठे,
१७. कुलसचिव, सर्व अभिमत विद्यापीठे,
१८. कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्र शिक्षण विद्यापीठ- लोणेरे.
१९. कुलसचिव, सी. ओ.ई. पी. तंत्रज्ञान विद्यापीठ, पुणे.
२०. कुलसचिव, आय. सी. टी. विद्यापीठ.
२१. कुलसचिव, डॉ. होमी भाभा राज्य विद्यापीठ, मुंबई.
२२. कुलसचिव, एल. आय. टी. अभिनव विद्यापीठ, नागपूर.
२३. निवड नस्ती/तांशि-५.